**"सांगली जिल्हयातील कृष्णा नदीवर सुखवाडी, ता.पलुस ते तुंग ता.मिरज दरम्यान पूलाचे बांधकाम करणे इजिमा.११७" या कामाच्या सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस मंजूरी प्रदान करणेबाबत........**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - सुप्रमा -२०१४/प्र.क्र.५६/रस्ते-५**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :-१४ जानेवारी, २०१५

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्र. पिएलएन-२०१३/सी आर- (१४६)/नि-३/ मंत्रालय, मुंबई दि. ११/०७/२०१३ अन्वये सांगली जिल्हयातील कृष्णा नदीवर सुखवाडी, ता.पलुस ते तुंग ता.मिरज दरम्यान पूलाचे बांधकाम करणे इजिमा.११७ या कामाच्या रु. ८,००,००,०००/- (रुपये आठ कोटी फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरच्या अंदाजपत्रकात १) पूल, २) पोचमार्ग, ३) भूसंपादन, ४) संकीर्ण बाबीचा समावेश आहे.

मुख्य अभियंता यांनी त्यांचे पत्र क्र. जा.क्र.का-२/कोल्हापूर/३०४७/२०१४, दिनांक १९ जून, २०१४ नुसार सदर कामासाठी लागणारा रु. १४.६३ कोटी इतक्या रकमेचा सुधारित अंदाज सादर केला आहे. सदरच्या अंदाजपत्रकात १) मुख्य पूल, २) जोडरस्ते, ३) भूसंपादन, ४) आकस्मिक खर्च, संगणकीकरण, इन्श्युरन्ससाठी पर्सेंटेज चार्जेस तसेच ५) २०१४-१५ साठी भाववाढ या बाबीचा समावेश आहे.

सदर कामाच्या रु. १४,६३,३९,७३५/- (रुपये चौदा कोटी त्रेसष्ठ लक्ष एकोणचाळीस हजार सातशे पस्तीस फक्त) इतक्या सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

तथापि, नियोजन तसेच वित्त विभागाने सुधारित प्रशासकीय मान्यतेची रक्कम रू. १२.४८ कोटी इतकी मर्यादीत केली आहे.

**शासन निर्णय :-**

सांगली जिल्हयातील कृष्णा नदीवर सुखवाडी, ता.पलुस ते तुंग ता.मिरज दरम्यान पूलाचे बांधकाम करणे इजिमा. ११७ या कामाच्या रू. १२.४८ कोटी (रुपये बारा कोटी अठ्ठेचाळीस लक्ष फक्त) इतक्या सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीस या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर कामासाठी सन २०१४- २०१५ च्या पुरवणी अर्थसंकल्पात तरतुद करण्यात यावी.

३. या कामावरील खर्च सुधारित अंदाजित खर्चाच्या मर्यादेत ठेवण्यात यावा.

४. सदर कामावरील खर्च ५०५४ मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च, ०३ राज्यमार्ग या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२६५/व्यय-११, दि.०७/१०/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार काढण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११४१५३६५५५८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laleetagouri Giribuwa

Digitally signed by Laleetagouri Giribuwa
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laleetagouri Giribuwa
Date: 2015.01.14 15:48:13 +05'30'

**( ललितागौरी गिरीबुवा )**
सहाय्यक अभियंता-श्रेणी १ तथा
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) मुंबई
२) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
३) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) नागपूर.
४) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
५) वित्त विभाग, (व्यय-११)मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
७) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम उत्तर विभाग, मिरज
९) निवडनस्ती कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०) संचालक,माहिती तंत्रज्ञान व समन्वय केंद्र,पुणे